**सादरीकरणाचे स्तर कमी करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**परिपत्रक क्रमांक : संकीर्ण १०.००/प्र.क्र.२१/१८ (र.व का.)**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : ८ ऑगस्ट, २०००.**

**शासन परिपत्रक: -**

मंत्रालयातील नस्त्यांचे सादरीकरणाचे टप्पे काय असावेत याबाबत कार्यालयीन कार्यपध्दती नियम पुस्तिकेच्या परिच्छेद २४ मध्ये पुढीलप्रमाणे सविस्तर सूचना देण्यात आलेल्या आहेत :-

"सर्वसामान्यपणे टिप्पणी सहाय्यक,अधीक्षक,कार्यासन अधिकारी,उप सचिव,सचिव,मंत्री या क्रमाने प्रकरणे सादर करण्यात येतील. तसेच ही प्रकरणे आवश्यक असेल त्या टप्प्यापर्यंतच सादर करण्यात येतील."

२. कार्यालयीन कार्यपध्दती नियम पुस्तिकेच्या परिच्छेद २४ (४) मध्ये अशाही सूचना दिलेल्या आहेत की,"वरीष्ठ सहाय्यकास किंवा अधिक्षकास विवक्षित प्रकारची प्रकरणे उप सचिवांकडे आणि कार्यासन अधिका-यास अशी प्रकरणे सचिवांकडे थेट पाठविण्याची परवानगी देता येईल. त्याचप्रमाणे उप सचिवांस विशिष्ट प्रकरणांच्या संबंधात थेट मंत्र्याशी संपर्क साधता येईल."

३. मात्र शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की काही विभागात क्षेत्रिय अधिका-यांकडून जे अहवाल मागविले जातात ते अहवाल मागविण्याची मान्यता घेण्याकरिता सुध्दा ही प्रकरणे सचिव स्तरापर्यंत सादर केली जातात. वास्तविक क्षेत्रिय अधिका-यांकडून अहवाल मागविण्याची प्रकरणे कार्यासन अधिकारी / अवर सचिवापर्यंतच पाठविणे आवश्यक आहे. सचिव स्तरापर्यंत ती पाठविण्याची आवश्यकता नाही. तसेच प्रत्येक प्रकरण किती स्तरावर हाताळले गेले पाहिजे याचाही फेरआढावा घेणे आवश्यक आहे.

४. शासनाच्या असेही निदर्शनास आले आहे की काही विभागात अगदी किरकोळ प्रकरणे सुध्दा मान्यतेकरिता सचिव / प्रधान सचिव / अपर मुख्य सचिव यांच्याकडे पाठविण्यात येतात. अशा प्रकारे कारण नसताना प्रत्येक प्रकरण वरीष्ठ स्तरावर पाठविल्याने कामास विलंब होतो. प्रशासनाच्या दृष्टीने हे योग्य नाही.

५. प्रत्येक सचिवांनी दर गुरुवारी सकाळी १०.०० ते १.०० वाजेपर्यंत अधिका-यांच्या बैठकीत प्रशासकीय सुधारणेच्या निरनिराळ्या बाबींचा आढावा घेण्याबाबतचे आदेश यापूर्वीच देण्यात आलेले आहेत. "कार्यपध्दतीत सुधारणा" हा त्यातील एक महत्वाचा विषय आहे. सर्व सचिवांनी पुढील गुरुवारच्या बैठकीत निरनिराळी प्रकरणे हाताळण्याची पध्दत ठरवावी व शासन निर्णय प्रक्रीयेतील अनावश्यक स्तर कमी करण्यासाठी ठोस कार्यवाही करावी.

(अ. [illegible].बोंगिरवार)
मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत,
१.मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२.मा.उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३.सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४.सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
५.सर्व मंत्रालयीन विभाग